**महाराष्ट्राचे द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण, २००१.**
**अंमलबजावणीबाबत.**

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र.डब्ल्यूआयपी-२००१/सीआर-२९४४/उद्योग-७.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.,
दिनांक :- १९ ऑक्टोबर २००१.

**प्रस्तावना :-**

द्राक्ष उत्पादनात महाराष्ट्र राज्य संपूर्ण देशात अग्रेसर आहे. राज्यात नाशिक व सांगली हे जिल्हे द्राक्ष लागवडीखालील कृषी क्षेत्र व द्राक्ष उत्पादन यात अग्रेसर आहेत. या जिल्हयांशिवाय, राज्यामध्ये, अहमदनगर, पुणे, सातारा, सोलापूर व उस्मानाबाद या जिल्हयांमध्ये द्राक्ष लागवड केली जाते. याव्यतिरीक्त, मराठवाड्यातील लातूर जिल्हयातही अलीकडील काळात द्राक्ष उत्पादन घेतले जात आहे. द्राक्षांची शास्त्रीयपध्दतीने लागवड करण्यामध्ये नाशिक व सांगली हे जिल्हे आघाडीवर आहेत. तेथील काही प्रगतशील शेतक-यांनी द्राक्ष निर्यात व प्रक्रिया क्षेत्रात पदार्पण केले आहे. परंतु, बहुतांश द्राक्ष उत्पादन हे खाण्याच्या द्राक्षांसाठीच होत असून काही थोड्या प्रमाणात द्राक्षांवर प्रक्रिया करुन मद्य, बेदाणे, सुकामेवा बनविले जातात. परंतु, बऱ्याच वेळा द्राक्षाचे पीक भरगोस आल्यास मालास बाजारपेठेत उठाव मिळत नाही आणि ते नाशवंत पीक असल्याने शेतकऱ्यांना आर्थिक नुकसान सोसावे लागते. वास्तविक, द्राक्ष बागायत ही शेती मोठया प्रमाणावर भांडवली गुंतवणूकीची आहे. त्यामुळे पीक हाताशी येवूनही त्याची वेळेत विक्री किंवा निर्यात न झाल्यास शेतकऱ्यांचे मोठया प्रमाणात आर्थिक नुकसान होत असते. अशा प्रकारे शेतकऱ्यांचे आर्थिक नुकसान होवू नये म्हणून व त्याचप्रमाणे द्राक्षाच्या लागवडीस प्रोत्साहन देण्याच्या हेतूने खाण्याकरिता द्राक्ष विकणे, सुकामेवा बनविणे या व्यतिरिक्त द्राक्षांपासून आर्थिकदृष्ट्या अधिक लाभदायक पर्यायी उत्पादनांची निर्मिती व्हावी यादृष्टीने स्वतंत्र धोरण जाहीर करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

शासनाच्या असेही निदर्शनास आले की, ज्याप्रमाणे परदेशात वाईन संदर्भात आंतरराष्ट्रीय प्रदर्शन आयोजित केली जातात व अशा प्रदर्शनात वाईन विक्रीबरोबरच विहित गुणवत्तेसह वाईनचा वर्षभर पुरवठा करणे शक्य होण्याबाबतीत मार्गदर्शनही केले जाते, त्या धर्तीवर राज्यातही वाईन उत्पादनास प्रोत्साहन दिल्यास अधिक रोजगार उपलब्ध होईल. त्याशिवाय शेतकऱ्यांनीही वाईन किंवा तत्सम द्राक्ष प्रक्रीया



GR-20020416114259000-1100

उत्पादनांसाठी विशिष्ट प्रकारच्या द्राक्षांची लागवड केल्यास त्यांना स्थानिक बाजारपेठेद्वारे आणि निर्यातीमधूनही अधिक लाभदायक उत्पन्न मिळू शकेल. यादृष्टीने, द्राक्ष प्रक्रीया उद्योग व वाईन उद्योग यांना राज्यात चालना मिळण्याच्या हेतूने आणि महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण,२००१ मधील तरतुदीनुसार, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत राज्यामध्ये शेतकऱ्यांचा सहभाग असलेले वाईन पार्क सांगली व नाशिक जिल्हयात स्थापन करण्याचीही कार्यवाही चालू आहे.

__*शासन निर्णय:*__

वरील सर्व बाबींचा विचार करुन राज्य शासनाने 'महाराष्ट्राचे द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण-२००१' जाहीर केले आहे. या धोरणाच्या अनुषंगाने, शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**(१) प्राधान्य क्षेत्र म्हणून जाहीर करणे :**

वाईन निर्मिती हा उद्योग वित्तीय सहाय्य उपलब्ध करुन देण्यासाठी प्राधान्य क्षेत्रात मोडत नसल्याने नाबार्ड कडून वित्तीय सहाय्य पुरवठा उपलब्ध होत नाही. शेतकऱ्यांच्या उत्पादनाला अधिक किंमत यावी व राज्यात रोजगाराच्या संधी निर्माण व्हाव्यात याकरीता वाईन घटक प्राधान्य क्षेत्र म्हणून जाहीर करण्याबाबत नाबार्डला विनंती करण्यात येईल.

**(२) लघु उद्योग म्हणून जाहीर करणे :**

लघु उद्योगाच्या गुंतवणूकीच्या मर्यादित असलेल्या वाईन निर्मिती करणाऱ्या घटकांना लघु उद्योग म्हणून गणण्यात येईल.

**(३) उत्पादन शुल्क दरामध्ये सवलत :**

दिनांक १९ सप्टेंबर २००१ पूर्वी ज्या वाईन घटकांचे उत्पादन सुरु झालेले आहे, अशा वाईन घटकांच्या उत्पादनावर आकारण्यात येणारे उत्पादन शुल्क उत्पादन खर्चाच्या १०० टक्के ऐवजी ५० टक्के एवढेच आकारण्यात येईल. ज्या वाईन घटकांचे उत्पादन दिनांक १९ सप्टेंबर २००१ रोजी अगर त्यानंतर सुरु झाले / होणार आहे, अशा वाईन घटकांसाठी उत्पादन शुल्काचा दर उत्पादन खर्चाच्या २५ टक्के एवढाच आकारण्यात यावा. सदर सवलत ५ वर्षे अनुज्ञेय असेल.

**(४) विक्रीकर सवलत :-**

सर्व राज्यांच्या सहमतीने मद्यार्कावरील २० टक्के हा फ्लोअर रेट ठरविण्यात आलेला आहे. वाईनची प्रक्रिया ही मद्यार्काहून सर्वस्वी वेगळी असून वाईन घटक हे

शेती प्रक्रिया या सदरात गणले जातात. ही बाब विचारात घेऊन, द्राक्ष प्रक्रीया उद्योगांना चालना देण्यासाठी वाईनवरील विक्रीकरचा फ्लोअर रेट कमी करण्याकरीता केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या सर्व राज्यांच्या अर्थमंत्र्यांच्या शक्तीप्रदान समितीला राज्य शासनाकडून विनंती करण्यात येईल.

**(५) विक्री परवाना :**

वाईन विकण्याकरीता बीअर बारना परवाने देण्यात येतील. तसेच बिअर बारच्या धर्तीवर वाईन बारनाही वाईन विक्रीसाठी परवाने देण्यात येतील.

**(६) वाईन विक्री परवाना शुल्क :**

वाईन विक्रीसाठी रु. ५०००/- प्रतिवर्षी या दराने अनुज्ञाप्ती शुल्क आकारण्यात येणार असून सदर शुल्कामध्ये येत्या ५ वर्षात वाढ केली जाणार नाही.

**(७) वाईन उत्पादन परवाना पध्दत सोईची करणे :**

वाईन उत्पादन शासनाने जाहीर केलेल्या वाईन पार्कमध्ये करण्यात येत असल्यास भूखंड वाटपाबरोबर वाईन उत्पादनाचा परवाना जिल्हा पातळीवर देण्यात येईल. इतर ठिकाणीही वाईन उत्पादनासाठी परवाना पध्दत सोपी करून जिल्हा पातळीवर जिल्हाधिकारी यांना अधिकार देण्यात येतील व ३० दिवसांच्या मुदतीत असे परवाना देण्याचे बंधन राहील. यापुढे, वाईन उद्योगासाठी बिगरशेती परवानगी आवश्यक रहाणार नाही.

**(८) वाईन इन्स्टिट्यूटची उभारणी :**

जागतिक पातळीवर वाईनचा दर्जा टिकविणे व आवश्यक ते प्रशिक्षित मनुष्यबळ उपलब्ध होण्यासाठी वाईन इन्स्टिटयूटची स्वतंत्र स्थापना करण्यात येणार आहे. वाईन इन्स्टिटयूटची उभारणी करण्याकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ / शासनाच्या नियमाप्रमाणे नाममात्र दराने भूखंड उपलब्ध करून देण्यात येईल. या संस्था प्रामुख्याने वाईन उद्योगासाठी आवश्यक असलेले प्रशिक्षण, तपासणी, संशोधन, माहिती केंद्र म्हणून काम पहातील. त्यासाठी स्वतंत्र ट्रस्ट करून संस्थांची उभारणी करण्यात येऊन अशा संस्था प्रथमतः सांगली व नाशिक येथे उभारण्यात येतील. याकरीता, खालील पर्यायातील सुयोग्य पर्यायानुसार प्रशिक्षण संस्था स्थापन करण्यात येतील :-

अ) अस्तित्वात असलेल्या ट्रस्टना सहाय्य करून प्रशिक्षण संस्था स्थापणे.

ब) अस्तित्वात असलेल्या ट्रस्टबरोबर संयुक्त क्षेत्रात प्रशिक्षण संस्था स्थापणे.

क) स्वतंत्र ट्रस्ट निर्माण करून प्रशिक्षण संस्था स्थापणे.

## (९) एक खिडकी योजना :

वाईन उद्योगासाठी आवश्यक परवानगी,भूखंड, वीज पुरवठा, दूरध्वनी इत्यादी सोईसुविधा एक खिडकी योजनेद्वारे सुलभतेने उपलब्ध करून दिल्या जातील.

## (१०) द्राक्ष बोर्डाची स्थापना :

महाराष्ट्रात वाईन व इतर द्राक्ष प्रक्रिया उद्योगांकरीता बोर्ड स्थापन करण्यात येईल. संबंधित उद्योग, द्राक्ष उत्पादक शेतकरी, राज्य शासन, शासकीय प्रयोगशाळा, वाईन इन्स्टिट्यूट इत्यादींचे प्रतिनिधी सदर बोर्डावर रहातील. सदर बोर्डाची निर्मिती करताना इतर देशातील तत्सम बोर्डाची रचना व कार्ये यांची तपासणी करुन त्याच धर्तीवर महाराष्ट्रातील द्राक्ष बोर्डाची स्थापना करण्यात येईल. सदर द्राक्ष बोर्डाचे कार्यक्षेत्र खालीलप्रमाणे राहील:-

अ) द्राक्ष लागवड व वाईन निर्मिती यांच्या दर्जाबाबत देखरेख करणे.

ब) लेबलला मान्यता देणे.

क) गुणवत्ता व दर्जा-मानके तपासणे.

ड) जागतिक स्तरावर द्राक्ष प्रक्रिया उत्पादनांची विक्री होण्यासाठी विविध उपाययोजना करणे.

द्राक्ष बोर्डाची स्थापना करण्याकरिता सुमारे रु.५.०० कोटी पर्यंतची रक्कम शासनामार्फत अनावर्ती स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येईल. येत्या आर्थिक वर्षात या बाबींकरीता रु.५.०० कोटींची तरतूद करण्यात येईल.

## (११) अन्न प्रक्रिया घटक :

वाईन उत्पादन घटकांना अन्न प्रक्रीया घटकांचा दर्जा देऊन अन्न प्रक्रिया उद्योग घटकांना ज्या सवलती दिल्या जातात त्या सवलती वाईन उत्पादन घटकांनाही देण्यात येतील.

## (१२) वाईन उत्पादक घटक पर्यटकांना खुले करण्याबाबत :-

वाईन उद्योग घटक पर्यटकांना पाहण्यासाठी खुले करण्याची जगभर चालू असलेली पध्दत महाराष्ट्रातही रुढ होण्यासाठी वाईन उद्योग घटकांमध्ये पर्यटकांना आस्वाद घेण्यासाठी वाईन उपलब्ध करून देण्याची परवानगी देण्यात येईल. तसेच, वाईन उद्योग घटकांना वाईनची किरकोळ विक्री करण्यासाठी परवाने देण्यात येतील.

मुद्र८०१२(५००-१०-०३)२३५

**(१३) आयात वाईनवर कर आकारणी करण्याबाबत :-**

(अ) **उत्पादन शुल्क :-** आयात होणाऱ्या वाईनवर उत्पादन शुल्क आकारता येत नाही. आयात होणाऱ्या वाईनवर उत्पादन शुल्काएवढा कर अन्यप्रकारे आकारण्याची बाब तपासून तेवढा कर आकारण्यात येईल.

(ब) **लेबलवरील व ब्रँडवरील फी :-** आयात वाईनसंबंधात ब्रँड / लेबलवर फी आकारली जात नाही. राज्यात / देशात उत्पादन होणाऱ्या वाईनवर लेबल / ब्रँड फी आकारली जाते. आयात केलेल्या वाईनवर लेबल वर व ब्रँड वर फी आकारण्याबाबत तपासणी करुन फी आकारण्यात येईल.

**(१४) द्राक्ष प्रक्रिया उत्पादक घटकांसंबंधात उत्पादन शुल्क विभागाच्या नियंत्रणात सुलभता आणण्याबाबत :-**

वाईन उत्पादक घटकासंबंधात उत्पादन शुल्क विभागाच्या नियंत्रणात सुलभता आणण्यासाठी प्रधान सचिव (उत्पादन शुल्क) विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात येईल. सदर समिती खालीलप्रमाणे असेल :-

| | | |
|---|---|---|
| १) | प्रधान सचिव, गृह विभाग (उत्पादन शुल्क) | अध्यक्ष |
| २) | सचिव (उद्योग) | सभासद |
| ३) | सचिव (कृषि) | सभासद |
| ४) | विकास आयुक्त (उद्योग) | सभासद |
| ५) | वाईन उत्पादक घटकाचे प्रतिनिधी | सभासद |
| ६) | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ | सभासद |
| ७) | आयुक्त (उत्पादन शुल्क विभाग) | सदस्य सचिव |

समिती आपला अहवाल १ महिन्यात शासनास सादर करेल.

तद्नुसार शासनाने जाहीर केलेल्या महाराष्ट्राचे द्राक्ष प्रक्रिया उद्योग, २००१

तरतुदी तपासून आवश्यक तेथे अधिनियम व नियमांमध्ये बदल करुन उचित आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यासाठी उद्योग संचालनालय, उत्पादन शुल्क आयुक्तालय, गृह विभाग (उत्पादन शुल्क व पर्यटन), वित्त विभाग, महसूल व वन विभाग, कृषि विभाग आणि उद्योग विभाग तसेच, महाराष्ट्र औद्योगिक विकास

महामंडळ व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांना या आदेशांद्वारे कळविण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मा.द. सरवणकर)
शासनाचे उप सचिव

प्रति :-

मंत्रालयीन विभाग (सर्व)
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
विकास आयुक्त (उद्योग), मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
आयुक्त (उत्पादन शुल्क), मुंबई

प्रत माहितीसाठी :-
मा. मुख्यमंत्री
मा. उपमुख्यमंत्री
मा. मंत्री (सर्व)
मा. राज्यमंत्री (सर्व)
मा. मुख्य सचिव

GR 20020416114259000-1100